राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे किंजळे तर्फे खेड नळ पाणी पुरवठा योजना ता. खेड, जि. रत्नागिरी या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१३१४/प्र.क्र.९५/पापु-०६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १५ जून, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ अ/पापु-०७, दिनांक १७/०३/२०१०
२) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ९/१०/२०१३
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९/०७/२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ९/०७/२०१४
५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबतचा शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७/१०/२०१४
६) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीच्या अधिकाराबाबत शासन परिपत्रक क्र.ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६/०२/२०१५
७) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रशासकीय खर्चासाठी अनुज्ञेय असलेल्या निधीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २०/०२/२०१५.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी, यांचे पत्र क्र. रजिप/ग्रापापु/तांशा-३/९२३, दिनांक २५/०२/२०१४.

**प्रस्तावना-**

मौजे किंजळे तर्फे खेड नळ पाणी पुरवठा योजना ता. खेड, जि. रत्नागिरी या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ४०,३८,००९/- किंमतीच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी माहे जून, २०१४ रोजी तांत्रिक मान्यता दिली आहे. प्रस्तुत नळ

पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च हा जिल्हा परिषदेच्या विविध निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव रत्नागिरी जिल्हा परिषदेने संदर्भाधीन अनु. क्र. ८ मधील पत्रान्वये शासनाच्या मान्यतेकरिता सादर केलेला आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय बाबींसाठी ७ टक्के खर्च आकारण्यात आलेला आहे. परंतु संदर्भाधीन अनु. क्र. ७ मधील शासन निर्णयानुसार प्रशासकीय बाबींसाठी ४ टक्के खर्च अनुज्ञेय करण्यात आलेला आहे. त्यामुळे वाढीव दरडोई खर्च असलेल्या मौजे किंजळे तर्फे खेड नळ पाणी पुरवठा योजना ता. खेड, जि. रत्नागिरी या नळ पाणी पुरवठा योजनेस संदर्भाधीन अनु. क्र. ७ मधील शासन निर्णयानुसार ४ टक्के खर्च धरुन प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मौजे किंजळे तर्फे खेड नळ पाणी पुरवठा योजना ता. खेड, जि. रत्नागिरी या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ६६७५/- (योजनेचा चाचणी खर्च वगळून) एवढ्या दरडोई खर्च असलेल्या योजनेस संदर्भाधीन अनु.क्र. ७ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे ४ टक्के मर्यादेपर्यंतचा खर्च प्रशासकीय कामासाठी अनुज्ञेय असल्याने रुपये ३९,२४,७९३/- (अक्षरी रुपये एकोणचाळीस लक्ष चोवीस हजार सातशे त्र्याण्णव फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) संदर्भाधीन अनु.क्र. ४ मधील शासन निर्णयाद्वारा ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पूर्णत: रद्द करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरीत करण्यात येणारा निधी हा संदर्भाधीन अनु. क्र. ४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

३) सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी. योजना पूर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, याची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पूर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती/ संदर्भाधीन अनु. क्र. ५ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावी.

२) योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरीत करण्यात येणारा निधी हा संदर्भाधीन अनु. क्र. ४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

३) योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी किमान रुपये १६००/- प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढी पाणी पट्टी निश्चित करावी व त्यात टप्प्याटप्प्याने वाढ करण्यात यावी. सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी स्वत: करावी. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

४) योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

५) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६) गाव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

८) योजनेतील कामे टप्प्याटप्प्याने करावीत. उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत. (उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.)

९) जास्त दराच्या निविदा स्वीकृत करण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेचे कार्यादेश देण्यात येऊ नयेत.

१०) अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

११) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१२) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधीन अनु. क्र. ३ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांची पूर्तता करण्यात यावी.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा. राज्य हिश्याची तरतूद राज्यस्तर तसेच जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी त्यांना जिल्हा नियोजन समितीमार्फत उपलब्ध होणाऱ्या निधीमधून करण्यात यावी.

5. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१५१५३९२९२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar
Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.06.16 14:36:25 +05'30'

( सु. दे. आंबेकर )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. सर्व मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य.

३. मा. प्रधान सचिव (पा.पु. व स्व.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
७. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर.
१०. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
११. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रत्नागिरी.
१२. अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, बेलापूर, नवी मुंबई.
१३. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
१५. महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई (लेखापरीक्षा व अनुज्ञेयता)
१६. महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता)
१७. मुख्य अभियंता तथा वि.का.अ.(पा.पु.व स्व.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन पापु-०१/०४/०५/०९/१३/१७ व १८.
१९.निवड नस्ती (पापु-०६ कार्यासन), पा.पु. व स्व. वि., मंत्रालय, मुंबई ३२.